**दर्शनिका विभाग, मुंबई यांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२५ पासून दिनांक ३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**

शासन निर्णय, क्रमांक: दर्शनि-२०२५/ प्र.क्र.४५ (E-Office- १०१९२७०) /सांका.२.
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- १० मार्च ,२०२५.

**संदर्भ** : १. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. आकृति-२१/प्र.क्र.१९४ (भाग-१)/आस्थापना, दि.२१.०६.२०२३.

२. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. दर्शनि २०२३/प्र.क्र.१८७/ सां.का.२, दि.०५.१०.२०२३.

३. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. दर्शनि २०२४/प्र.क्र.४८/ सां.का.२, दि.२०.०९.२०२४.

४. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि.०३.०३.२०२५.

५. कार्यकारी संपादक व सचिव, दर्शनिका विभाग, मुंबई यांचे पत्र क्र.२२०, दि.०५ मार्च २०२५

**प्रस्तावना :**

पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील दर्शनिका विभाग, मुंबई या कार्यालयाच्या आस्थापनेवरील ३९ पदांच्या (३३ नियमित पदे + बाह्ययंत्रणेद्वारे घ्यावयाच्या ६ मनुष्यबळ सेवा) सुधारीत आकृतीबंधास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये, दर्शनिका विभागाच्या आस्थापनेवरील संचालनाच्या आस्थापनेवरील ३३ नियमित मंजूर पदांपैकी २६ पदांना स्थायी पदे व ०७ पदांना अस्थायी पदे म्हणून मंजूरी देण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये, दर्शनिका विभागातील २६ अस्थायी पदे, दि.०१.०९.२०२४ पासून दि.२८.०२.२०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मंजूरी देण्यात आली असून, सदरची मुदतवाढ आता संपुष्टात आली आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयानुसार, अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ पासून दि.३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत प्रशासकीय विभागास अधिकार प्रदान केले आहेत. तद्नुषंगाने, कार्यकारी संपादक व सचिव, दर्शनिका विभाग, मुंबई यांनी संदर्भ क्र. ५ येथील पत्रान्वये, दर्शनिका विभागाच्या आस्थापनेवरील ०७ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत, विनंती केली आहे. त्यानुसार दर्शनिका विभागाच्या आस्थापनेवरील ०७ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

दर्शनिका विभाग, मुंबई यांच्या कार्यालयातील खालील विवरणपत्र-१ व विवरणपत्र-२ येथे नमूद केलेल्या ३+४ अशा एकूण ०७ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ पासून दि.३१.०८.२०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास, सदर शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे:-

**विवरणपत्र-**

| अ.क्र. | पद | संवर्ग | वेतनस्तर | संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | संशोधन अधिकारी | गट-ब | S-१५, रु. ४१८००-१३२३०० | १ |
| २ | प्रशासकीय अधिकारी | गट-ब | S-१५, रु. ४१८००-१३२३०० | १ |
| ३ | सहायक | गट-क | S-८, रु. २५५००-८११०० | १ |
| ४ | लिपिक-टंकलेखक | गट-क | S-६, रु. १९९००-६३२०० | १ |
| | | एकूण | | ४ |

**विवरणपत्र-२**

| अ.क्र. | पद | संवर्ग | वेतनस्तर | संख्या |
|---|---|---|---|---|
| २ | सहायक संशोधन अधिकारी | गट-ब | S-१४, रु. ३८६००-१२२८०० | २ |
| ३ | लिपिक-टंकलेखक | गट-क | S-६, रु. १९९००-६३२०० | १ |
| | | एकूण | | ३ |

२. या शासन निर्णयान्वये उपरोक्त ३+४ अशा एकूण ०७ अस्थायी पदांना, दि.०१.०३.२०२५ पासून दि.३१.०८.२०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास खालील अटींच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

१. ज्या प्रयोजनार्थ ही पदे निर्माण केली आहेत त्याच प्रयोजनार्थ त्या पदाचा विनियोग करण्यात यावा.

२. या पदांपैकी कोणतेही पद सहा महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त राहणार नाही.

३. या पदांवरील अपेक्षित खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

२. "विवरणपत्र-१" मध्ये नमूद केलेल्या ४ अस्थायी पदांवर होणारा खर्च "मागणी क्र. झेडडी-१, २०७०, इतर प्रशासनिक सेवा, (००) ८००, इतर खर्च, (००) (०१) महाराष्ट्र जिल्हा दर्शनिका संपादक मंडळ (२०७०००७९१) ०१ वेतन" या लेखाशिर्षाखाली त्या त्या आर्थिक वर्षात मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

तसेच “विवरणपत्र-२” मध्ये नमूद केलेल्या ३ अस्थायी पदांवर होणारा खर्च “मागणी क्र.झेडडी-१,२२२०, माहिती व प्रसिध्दी (६०), इतर (००) ११०, प्रकाशने (०१)(०१) भारतीय स्वातंत्र्य आंदोलन इतिहास समिती,महाराष्ट्र राज्य (अनिवार्य) (२२२००४९१) ०१ वेतन” या लेखाशिर्षाखाली त्या त्या आर्थिक वर्षात मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५ अन्वये, प्रशासकीय विभागाला प्रदान केलल्या अधिकारानूसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३१०१५१०१७०७२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT, 2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAF9D9317025580944685E047B9C52D64C532684054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2025.03.10 15:11:09 +05'30'

**(नंदा राऊत)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. कार्यकारी संपादक व सचिव,दर्शनिका विभाग,मुंबई.
२. महालेखापाल लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा महाराष्ट्र-१ मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
५. कक्ष अधिकारी(व्यय-१५, अर्थ-११),वित्त विभाग , मंत्रालय,मुंबई.
६. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७. निवडनस्ती -सां.का.२.